एकात्मिक बाल विकास सेवा योजनेतंर्गत १०४
नागरी प्रकल्पातील अस्थायी पदांना .१.३.२०२४
ते दि.३१.८.२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग,**
**शासन निर्णय क्र. मबाआ-२०२४/प्र.क्र.२७/का-७-अ**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय,मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: - ११ मार्च,२०२४.

**संदर्भ:-** १. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र. मबाआ-२००२ / प्र.क्र.९५ / का-७, दि.०५.०४.२००३,
२. शासन निर्णय वित्त विभाग क्र. असंक-१००४/प्र.क्र.१२/(भाग-२)/२००४/वित्तीय सुधारणा-१, दि. ०४.१०.२००४,
३. शासन निर्णय महिला व बाल विकास विभाग क्र. एबावि २००३/प्र.क्र.४३८/का-६, दि.१४.०१.२००४,
४. शासन निर्णय महिला व बाल विकास विभाग क्र. मबाआ २०२०/प्र.क्र.३६/का-७, दि.४.३.२०२२
५. शासन निर्णय महिला व बाल विकास विभाग क्र. एबावि२०२२/प्र.क्र.१७५/का-६, दि.१०.१.२०२४
६. शासन निर्णय महिला व बाल विकास विभाग क्र.मबाआ-२०२३/प्र.क्र.३१/का-७ अ, दि.६.१०.२०२३,
७. शासन निर्णय महिला व बाल विकास विभाग क्र.एबावि-२०२२/प्र.क्र.१७५/का-६, दि.१०.१.२०२४
८. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई यांचे पत्र क्र. एबाविसेयो / का- १ / अपदे / पदे नि.मान्यता /२०२४ /९९८, दि.२८.२.२०२४,
९. वित्त विभाग शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क, दि.२१.२.२०२४

**प्रस्तावना:-**

एकात्मिक बाल विकास सेवा योजनेतंर्गत नागरी प्रकल्पासाठी निश्चित केलेल्या आकृतीबंधांनुसार १०४ नागरी प्रकल्पातील नियमित वेतन श्रेणीतील ११९० कार्यरत अस्थायी पदे तसेच १९८०० अंगणवाडयामधील १९७९९ अंगणवाडी सेविका व १९५८९ अंगणवाडी मदतनीस यांची एकूण ३९३८८ मानधनी पदे अशी एकूण ११९०+३९३८८=४०५७८ अस्थायी/मानधनी पदांना दि.०१.०९.२०२३ ते दि.२९.२.२०२४ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास संदर्भाधीन क्रमांक-६ येथील दि.६.१०.२०२३ च्या शासन निर्णयान्वये मुदतवाढ देण्यात आली होती.

**२.** वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.४ येथिल दि.२१.२.२०२४ च्या शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना, तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या, परंतु ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दि.१.३.२०२४ ते दि.३१.८.२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार देण्यात आले आहेत.

३. एकात्मिक बाल विकास सेवा योजनेमधील नागरी प्रकल्पांतर्गत कार्यरत असलेल्या नियमित वेतनश्रेणीत वेतन घेणारी पदे व मानधनी पदांपैकी रिक्त असलेली पदे ही सहा महिन्यापेक्षा जास्त काळ रिक्त नाही, असे आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई यांनी संदर्भाधीन क्रमांक ७ येथील दि.२८.२.२०२४ च्या पत्रान्वये प्रमाणित केले आहे. त्यानुसार एकात्मिक बाल विकास सेवा योजनेंतर्गत नागरी प्रकल्पासाठी निश्चित केलेल्या आकृतीबंधानुसार १०४ नागरी प्रकल्पातील नियमित वेतनश्रेणीतील कार्यरत अस्थायी पदे तसेच १९८०० अंगणवाडयामधील अंगणवाडी सेविका व अंगणवाडी मदतनीस या मानधनी पदांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णयः</u>-**

एकात्मिक बाल विकास सेवा योजनेंतर्गत नागरी प्रकल्पासाठी निश्चित केलेल्या आकृतीबंधानुसार १०४ नागरी प्रकल्पातील नियमित वेतनश्रेणीतील ११९८ कार्यरत अस्थायी पदे तसेच १९८०० अंगणवाडयामधील २०००९ अंगणवाडी सेविका व २०००९ अंगणवाडी मदतनीस यांची एकूण ४००१८ मानधनी पदे अशा एकूण ११९८+४००१८= ४१२१६ पदांना दि.१.३.२०२४ ते दि. ३१.८.२०२४ पर्यंत या शासन निर्णयाद्वारे मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. सदरचा शासन निर्णय, वित्त विभाग शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क.,दि.२१.२.२०२४ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळाद्वारे उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३१२११३८२७५६३० असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SHIVAJI P
KARWAR

Digitally signed by SHIVAJI P KARWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=46ec07554eac404147684ed8b27adc8a1c2a78fe8ffea3c9dd01377e25f76a36, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=579FDC49AAE09A107A14D18D2E6E7AEC6E608DE79CB8407CA0E64638BB98CDB0, cn=SHIVAJI P KARWAR
Date: 2024.03.12 11:47:29 +05'30'

**( शिवाजी पां.कारवार )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई,
२. आयुक्त,महिला व बाल विकास आयुक्तालय,पुणे,
३. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद (आयुक्तालय, नवी मुंबई यांचेमार्फत),
४. सर्व जिल्हा महिला बाल विकास अधिकारी (आयुक्तालय, नवी मुंबई मार्फत),
५. सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी (आयुक्तालय, नवी मुंबई मार्फत),
६. मुख्य लेखापरीक्षक,स्थानिक निधी लेखा,ठाणे (आयुक्तालय, नवी मुंबई यांचेमार्फत),
७. महालेखापाल,महाराष्ट्र राज्य १/२ (लेखा व अनुज्ञेयता) ( लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर,
८. अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई,
९. निवासी लेखा परिक्षा अधिकारी,मुंबई,
१०. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,(आयुक्तालय, नवी मुंबई मार्फत),
११. वित्त विभाग (का-व्यय-१४/अर्थसंकल्प-१९/वित्तीय सुधारणा-१), मंत्रालय,मुंबई,
१२. निवड नस्ती, का-७अ.